**क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य या योजनेंतर्गत संस्थांना क्रीडा सुविधा निर्मिती /क्रीडा साहित्यासाठी आर्थिक सहाय्य उपलब्ध करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- क्रीडासु-३३२३/प्र.क्र.१३/कीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ मार्च, २०२३

<u>वाचा</u>:-

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. राक्रीधो-२०११/प्र.क्र. ५५/क्रीयुसे-१, दि. १४ जून, २०१२.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२६०/क्रीयुसे-१, दि. ०१ मार्च, २०१४.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/ २०२०-२१/का-९/५२११ दि.२० ऑक्टोबर,२०२०
४) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीयुनि/आर्थिक सहाय्य/ २०२१-२२/का-९/२८१, दि.३०.४.२०२१
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/ २०२१-२२/का-९/१५५, दि.१०.१.२०२२
६) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/ २०२१-२२/का-९/७०२, दि.१७.०२.२०२२
७) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/ २०२२-२३/का-९/७६९४, दि.२०.१.२०२३
८) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/ २०२२-२३/का-९/८०८८, दि.१६.०२.२०२३
९) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/ २०२२-२३/का-९/८१८५, दि.२३.०२.२०२३
१०) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/ २०२२-२३/का-९/८४८९, दि.१५.०३.२०२३

<u>प्रस्तावना</u>:-

"क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे" ही क्रीडा धोरणातील एक महत्वाची शिफारस आहे. दर्जेदार क्रीडा सुविधा निर्माण करुन त्याद्वारे खेळाडूंच्या कामगिरीत वाढ करुन राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय खेळाडू निर्माण करण्यास चालना देणे हे या योजनेचे उद्दिष्ट आहे. यासंदर्भातील सविस्तर कार्यपध्दती उपरोक्त संदर्भाधीन क्र. (२) येथील शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ अन्वये विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार राज्यातील खाजगी / शासनाच्या मार्फत चालविण्यात येणाऱ्या व राज्य शासनाच्या संबंधित विभागांनी मान्यता दिलेल्या शैक्षणिक संस्था,स्थानिक/नागरी स्वराज्य संस्था, स्थानिक स्वराज्य संस्थेच्या शाळा, कनिष्ठ महाविद्यालय, आदिवासी विकास विभागाच्या आश्रमशाळा, राज्य शासनाची विभागीय / जिल्हा/तालुका

क्रीडासंकुले, विविध खेळांच्या विकासासाठी कार्यरत असणाऱ्या व सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० किंवा संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये पंजीबध्द असतील अशा व्यायाम संस्था, क्रीडा मंडळे, क्रीडा संघटना इत्यादींना क्रीडा सुविधा निर्मितीस ७५:२५ (शासनाचा हिस्सा ७५% व संबधित पात्र संस्थेचा हिस्सा २५ %) याप्रमाणे आर्थिक सहाय्य देण्यात येते तसेच त्याचप्रमाणे क्रीडा साहित्यासाठी आर्थिक सहाय्य देण्यात येते. यांसदर्भात संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयातील परि.क्र.४ (अ) व (ब) नुसार अटी शर्ती स्पष्ट केल्या आहेत. त्यानुषंगाने क्रीडा सुविधा निर्मिती / क्रीडा साहित्य यासाठी आर्थिक सहाय्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांनी संदर्भ क्रमांक ३ ते १० अन्वये पात्र संस्थांचे प्रस्ताव शिफारशीसह शासनास सादर केले आहेत. सदर शिफारशींना अनुसरुन व संदर्भाधिन शासन निर्णय दि.१.३.२०१४ मधील अटी व शर्तींच्या अधीन राहून क्रीडा सुविधा निर्मितीसाठी व क्रीडा साहित्यासाठी आर्थिक सहाय्य देण्याच्या प्रस्तावांना तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

खालील परिशिष्ट-अ मधील अ.क्र.१ ते १० येथील पात्र संस्थांना संदर्भाधिन शासन निर्णय, दिनांक ०१ मार्च, २०१४ मध्ये नमूद अनुदानासाठीची पात्रता व अनुदान मंजूरीच्या अटी व शर्तींचे पालन करण्याच्या तसेच प्रकल्पाच्या अंदाजपत्रकीय किंमतीची तपासणी व अन्य अटींच्या अधिन राहून विहीत शासन अनुदान मर्यादेत (७५%) स्तंभ-३ येथे नमूद क्रीडा सुविधा निर्मितीसाठीच्या प्रकल्पांसाठी स्तंभ-६ नुसार राज्य शासनाच्या अनुदान मर्यादेत अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याच्या प्रस्तावास तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**तसेच** परिशिष्ट-ब येथील १ ते १० येथील संस्था या शासकीय संस्था असून संदर्भाधिन शासन निर्णय १.३.२०१४ मधील परि.४ (ब) १० नुसार त्या संस्थांना स्वहिश्शाची अट लागू नाही. सबब या संस्थांना परिशिष्ट-ब मधील स्तंभ क्र. ७ नुसार विहीत अनुदान मर्यादेत अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याच्या प्रस्तावास तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

## <u>परिशिष्ट-अ</u> ( क्रीडा सुविधा प्रकल्प )

*रक्कम रू. लाखांमध्ये*

| *अ. क्र* | *संस्थेचे नाव* | *प्रकल्प* | *प्रकल्पाची अंदाज-पत्रकीय रक्कम* | *शा.नि. दि.१.३.२०१४ नुसार प्रकल्पावरील विहीत खर्च मर्यादा* | *राज्य शासन अनुदान मर्यादा (७५%)* | *स्थेचा हिस्सा (२५%)* |
|---|---|---|---|---|---|---|
| *१* | *२* | *३* | *४* | *५* | *६* | *७* |
| १ | ऑफीसर्स क्लब, लातूर | जलतरण तलाव (२५ ×१३ मी) | १५१.७० | ५०.०० | ३७.५० | १२.५० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २ | किसान विद्या प्रसारक संस्था, शिरपूर,धुळे | बंदीस्त प्रेक्षागृह बांधकाम | २५३.२० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० |
| ३ | भगवानबाबा ग्राम विकास संस्था, येळी, ता.पाथर्डी, जि.अहमदनगर | बंदीस्त प्रेक्षागृह | ५८.५० | ४०.०० | ३०.०० | १०.०० |
| ४ | भगवानबाबा ग्राम विकास संस्था, येळी, ता.पाथर्डी, जि.अहमदनगर | ८ लेन्सचा धावनपथ तयार करणे | २०.८० | २०.०० | १५.०० | ५.०० |
| ५ | ज्ञानवर्धिनी चॅरीटेबल ट्रस्ट तळेरे, ता.कणकवली, जि.सिंधुदुर्ग | बंदीस्त प्रेक्षागृह | ४२.३१ | ४०.०० | ३०.०० | १०.०० |
| ६ | देवेन्द्र ग्रामविकास प्रतिष्ठाण खुपटी, ता. नेवासा, जि.अहमदनगर | बंदीस्त प्रेक्षागृह | १२५.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० |
| ७ | ग्रामपंचायत पहूरपेठ, ता.जामनेर, जि.जळगाव | बंदीस्त प्रेक्षागृह | १२०.२६ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० |
| ८ | पहुर ग्रुप एज्युकेशन सोसायटी संचलित आर.टी. लेले हायस्कुल व ज्युनियर कॉलेज, पहुर, ता. जामनेर, जि. जळगाव | बंदीस्त प्रेक्षागृह | ९०.७६ | ९०.०० | ६७.५० | २२.५० |
| ९ | नगरपंचायत, शेंदुर्णी, ता. जामनेर, जि. जळगाव | बंदीस्त प्रेक्षागृह | ११९.९८ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० |
| १० | धर्मवीर दिलीपराव रहाटे शिक्षण व बहुउद्देशीय संस्था, मेहकर जि. बुलढाणा | बंदीस्त प्रेक्षागृह | १३८.११ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० |
| | | | | ***एकूण*** | ***६३०.००*** | - |

**<u>परिशिष्ट-ब</u> (क्रीडा साहित्य प्रस्ताव)**

*रक्कम रू. लाखामध्ये*

| *अ. क्र* | *संस्थेचे नाव* | *क्रीडा साहित्य प्रकार* | *शासन निर्णयानुसार अनुदान मर्यादा* | *राज्य शासन हिस्सा* | *संस्थेचा हिस्सा* | *राज्य शासनाकडून देय अनुदान ** |
|---|---|---|---|---|---|---|
| *१* | *२* | *३* | *४* | *५* | *६* | *७* |
| १ | ग्रामपंचायत बेटावद बु. ता. जामनेर जि. जळगाव | कबड्डी सिंथेटीक मॅट | ४.०० | ३.०० | **शासन निर्णय दि. १.३.२०१४ मधील परि.४ (ब)१० नुसार शासकीय संस्थांना स्वहिश्शाची अट लागू नाही** | ४.०० |
| २ | ग्रामपंचायत पहूर कसबे ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ५.०० | ३.७५ | | ५.०० |
| ३ | ग्रामपंचायत नेरी बु. ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ५.०० | ३.७५ | | ५.०० |
| ४ | ग्रामपंचायत पळसखेडे प्र. न. (मिराचे) ता. जामनेर जि. जळगाव | कबड्डी सिंथेटीक मॅट | ४.०० | ३.०० | | ४.०० |
| ५ | ग्रामपंचायत वाकडी ता. जामनेर जि. जळगाव | कबड्डी सिंथेटीक मॅट | ४.०० | ३.०० | | ४.०० |
| ६ | ग्रामपंचायत फत्तेपूर ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ५.०० | ३.७५ | | ५.०० |
| ७ | ग्रामपंचायत नेरी दिगर ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ५.०० | ३.७५ | | ५.०० |
| ८ | ग्रामपंचायत वाकोद/जांभोळ ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ५.०० | ३.७५ | | ५.०० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ९ | ग्रामपंचायत देऊळगाव गुजरी ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ५.०० | ३.७५ | | ५.०० | |
| १० | ग्रामपंचायत, कवठे, ता.वाई, जि.सातारा | कबड्डी सिंथेटीक मॅट | ४.०० | ३.०० | | ४.०० | |
| | | | | | *एकुण* | *४६.००* | |

** क्रीडा साहित्याची स्तंभ क्र. ४ येथील एकुण अनुदान मर्यादा विचारात घेऊन व शासकीय संस्थांना स्वहिश्शाची अट नसल्याने वरील स्तंभ क्र.७ नुसार अनुदान मंजूर करण्यात येत आहे.*

२. उपरोक्त परिशिष्ट-अ **व** ब येथील संस्थांना वरीलप्रमाणे क्रीडा सुविधा प्रकल्प / क्रीडा साहित्य याकरिता अनुज्ञेय आर्थिक सहाय्य् /अनुदान, “मागणी क्र.ई-३ लेखाशिर्ष् २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा, (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे (कार्यक्रम) (२२०४५७०६), ३१ सहायक अनुदाने वेतनेतर” या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात यावे.

३. उपरोक्त संस्थांचा शासन निर्णयात निश्चित केलेल्या अनुदान वितरणाबाबतच्या अटी/ शर्ती तपासून व विहीत कार्यपध्दतीनुसार निधी वितरणाबाबतचा प्रस्ताव आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी स्वतंत्रपणे शासनास सादर करावा. सदर प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत, निधी उपलब्धतेनुसार तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या वित्तीय निर्देशानुसार निधी वितरणासंदर्भात स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१७१७०९१५१६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e918 6e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F4 99D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.03.17 17:15:19 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
११.मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१२.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३.संबधित विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१४.संबधित जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१५.वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१६.नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१७.निवड नस्ती (क्रीयुसे-१).